**आशा स्वयंसेविका यांना ग्राम आरोग्य पोषण पाणी पुरवठा व स्वच्छता समितीचे सदस्य सचिव करणेसाठी सुधारित शासन निर्णय.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः साआवि-२०१७/प्र.क्र. ३३७/आ-७**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : ३० जून, २०१८.

**वाचा :-** शासन निर्णय, क्र. ग्रापापु-१०६/प्र.क्र.३६९/पापु-०७ मुंबई, दिनांक ६ डिसेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राज्यात ४००१२ महसूली गावांमध्ये ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती स्थापन करण्यात आल्या आहेत. समितीच्या माध्यमातून गावांचा आरोग्य दर्जा उंचावणी, पोषण विषयक जागृती घडविणे, गावाचा परिसर स्वच्छ ठेवणे, शुध्द पाणीपुरवठा उपलब्ध करुन देणे इत्यादी आरोग्य विषयक बाबी राबविण्यात येतात. समितीच्या माध्यमातून आरोग्य विषयक जनजागृती करणेसाठी आशा स्वयंसेविका यांना समितीचे सदस्य सचिव करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राष्ट्रीय आरोग्य अभियानअंतर्गत राज्यात गावांचा आरोग्य दर्जा उंचावणे, पोषण विषयक जागृती घडविणे, गावाचा परीसर स्वच्छ ठेवणे, शुध्द पाणीपुरवठा करणे इत्यादी आरोग्य विषयक सुविधा उपलब्ध करून देण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती स्थापन करण्यात आली आहे. सदर समितीमध्ये खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत :-

१) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीची सदस्य सचिव अंगणवाडी सेविकेऐवजी आशा स्वयंसेविका राहतील.
२) अंगणवाडी सेविका, ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीच्या सदस्य राहतील.

३) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे अध्यक्ष सरपंच राहतील. परंतु ग्रुप ग्रामपंचायती अंतर्गत एकापेक्षा जास्त ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती कार्यरत असल्याने सरपंच हे एकाच गावाच्या ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती चे अध्यक्ष राहतील व उर्वरित ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती साठी ग्रामसभेमध्ये ठराव घेऊन समिती सदस्यांपैकी एका सदस्याची ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती अध्यक्ष पदी नियुक्ती करण्यात यावी.

४) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे अध्यक्ष व आशा स्वयंसेविका यांच्या नावाने समितीचे संयुक्त बँक खाते कार्यरत राहील.

२. ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती सदस्य सचिव या नात्याने आशा स्वयंसेविकांनी खालील कामे करणे आवश्यक आहे :-

अ) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीची सभा महिन्यातून एकदा नियमित आयोजित करणे.

आ) प्रत्येक ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती सभेचे इतिवृत्त तयार करणे. इतिवृत्तावर अध्यक्ष व सदस्य सचिव यांच्या सह्या घेण्यात याव्यात. समिती सदस्यांना इतिवृत्ताची प्रत देण्यात यावी.

इ) इतिवृत्तामध्ये नमूद बाबींची खरेदी, दुरुस्ती नियमाप्रमाणे करण्यात यावी.

ई) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती स्तरावर कॅलेंडर उपलब्ध करुन दिलेले असून त्यानुसार सभेमध्ये चर्चा करुन महिनानिहाय कार्यक्रमांची अंमलबजावणी करणे.

उ) समिती निर्णयानुसार जमा खर्चाचे रजिस्टर, इतिवृत्त रजिस्टर, पावती, बिल देयक रजिस्टर, बँकेचे चेक बुकनुसार झालेले पेमेंटचा तपशील याबाबींचे सर्व लेखे सांभाळण्याची जबाबदारी आशा स्वयंसेविका यांची राहील. या कामात इतर आशा स्वयंसेविका सदस्य सचिव आशाला मदत करतील.

ऊ) आरोग्य सेविका व बहुउद्देशीय आरोग्य कर्मचारी (एमपीडब्ल्यु) यांनी ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती समितीचे रेकॉर्ड दर महिन्याला नियमित तपासावे.

३. <u>ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती सदस्य सचिव म्हणून आशांचे निवड करण्याचे निकष खालील प्रमाणे आहेत :-</u>

१) एका गावात एकापेक्षा जास्त आशा स्वयंसेविका कार्यरत असल्यास त्यापैकी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात ज्या आशाच्या कार्यक्षेत्रात नवजात मृत्यूचे प्रमाण कमी असेल त्या आशा

स्वयंसेविकेला ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे सदस्य सचिव करण्यात यावे. उर्वरित आशा स्वयंसेविका सदस्य सचिव आशाला ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती च्या कामात सहकार्य करतील.

२) तसेच, दोन आशांचे नवजात मृत्यूचे प्रमाण एकसारखे असल्यास त्यावेळी बालमृत्यू, मातामृत्यूचे प्रमाण कमी असलेल्या आशा स्वयंसेविकेला ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे सदस्य सचिव करण्यात यावे.

३) ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती अंतर्गत एक आशा सदस्य सचिव व इतर उर्वरित आशा समितीचे सदस्य राहतील.

४. <u>ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता</u> <u>समितीचे संनियंत्रण खालीलप्रकारे करण्यात यावे:-</u>

१) प्राथमिक आरोग्य केंद्र स्तरावरील आशांच्या मासिक आढावा बैठकीमध्ये वैद्यकीय अधिकारी यांनी ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचा आढावा घ्यावा.

२) गट प्रवर्तक व तालुका समुह संघटक यांनी आशा स्वयंसेविकांच्या माध्यमातून आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता या योजनेचा आढावा घ्यावा.

३) गट प्रवर्तक व तालुका समुह संघटक यांनी त्यांच्या आशाभेटी दरम्यान ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती योजनेचे कामकाज पहाणे अनिवार्य राहील.

४) आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे आशा स्वयंसेविका, गट प्रवर्तक, तालुका समुह संघटक, प्राथमिक आरोग्य केंद्र वैद्यकीय अधिकारी, तालुका वैद्यकीय अधिकारी व जिल्हा आरकेएस समन्वयक यांच्या माध्यमातून संनियंत्रण करण्यात यावे.

५. <u>आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता</u> <u>समितीचे लेखा परिक्षण खालीलप्रकारे करण्यात यावे :-</u>

- प्रत्येक आर्थिक वर्षात ग्रामपंचायतीचे लेखापरिक्षण करण्यात येत असून त्याचवेळी आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे लेखापरिक्षण करुन घेण्यात यावे.
- आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता निधी खर्चाचे प्रमाण :- समिती निधी हा आरोग्य, पोषण, स्वच्छता व पाणीपुरवठा या बाबींवर खर्च करण्यात यावा. समिती निधीच्या खर्चाचे प्रमाण सर्व साधारणपणे खालीलप्रमाणे असावे.
- आरोग्य :- ६० %
- पोषण :- २० %
- स्वच्छता :- १० %

- पाणीपुरवठा :- १० %

  या व्यतिरिक्त ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीने त्यांच्या आवश्यकतेनुसार निर्णय घेऊन निधी खर्च करावा.

## ६. ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीचे कामकाज खालीलप्रमाणे असेल :-

अ) आरोग्य :-

१) आपत्कालीन परिस्थितीत अत्यावश्यक रुग्णास तातडीच्या सेवांची उपलब्धता करुन देणे संदर्भ सेवेसाठी वाहन उपलब्ध नसल्यास गावातील इतर वाहनांची सोय करुन देणे व त्यासाठी खर्च ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समितीच्या निधीमधून करणे.

२) आरोग्य संस्थांच्या कामकाजाबाबत उपलब्ध योजनांबाबत माहिती होणेसाठी ग्राम आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता समिती सदस्यांनी आरोग्य संस्थांना भेट देणे.

३) साथीचे आजार / रक्तदाब / विविध आजार / मासिक पाळी इ. व इतर अशा अनेक बाबींसाठी जनजागृती कार्यक्रमांचे आयोजन करणे आवश्यक आहे.

ब) पोषण :-

१) अंगणवाडी / प्राथमिक किंवा माध्यमिक शाळा यांच्या परिसरात परसबाग विकसीत करावी. समितीने परसबागेत पोषणयुक्त भाज्यांची लागवड करण्यासाठी छोटेखानी कार्यक्रम आयोजित करावा.

२) पोषणयुक्त आहार मिळणेसाठी पालकांना अनुभवी लोकांच्या माध्यमातून आहार प्रात्यक्षिके आयोजित करणे.

३) किशोरवयीन मुलींमधील रक्तक्षयाबाबत जनजागृतीपर कार्यक्रम आयोजित करणे.

४) आरोग्य शिबिर आयोजित करणे.

क) स्वच्छता :-

१) सार्वजनिक शौचालय स्वच्छता.

२) शौचालयामध्ये सांडपाण्याच्या पाईपला जाळी बसविणे.

३) डासोत्पत्ती ठिकाणे नाहीशी करण्यासाठी पाणी वाहते करणे.

४) गरजेनुसार हिवताप / डेंग्यू साथीचे वेळी धूरळणी करणे.

५) गावातील सार्वजनिक ठिकाणांच्या स्वच्छतेवर भर देणे.

६) निर्मलग्राम (हगणदारीमुक्त) करणेसाठी जनजागृतीपर कार्यक्रम घेणे.

ड) पाणीपुरवठा :-

१) गावातील पाणवठाचा परिसर स्वच्छ ठेवणे.

२) हातपंप, नळगळती दुरुस्ती यासाठी ग्रामपंचायत निधी उपलब्ध नसल्यास आरोग्य पोषण पाणीपुरवठा व स्वच्छता निधी समितीच्या मंजूरीने वापरावा.

इ) इतर आवश्यक बाबी :-

१) समितीचे कामकाजासाठी स्टेशनरी खरेदी.

२) समिती सभेसाठी चहा पाणी खर्च.

३) भिंतीवर गेरुने म्हणी लिहून जनजागृती करणे.

७. **समितीने त्यांचा निधी खालील बाबींवर खर्च करु नये :-**

१) बांधकाम व इमारत दुरुस्ती तसेच, परिसर स्वच्छता, गवत काढणे अशा बाबींवर खर्च करु नये.

२) अंगणवाडीतील मुलांसाठी कोणत्याही प्रकारचे खायचे पदार्थ (प्रोटीन पावडर व बिस्किट) यावर समिती निधीमधून खर्च करण्यात येऊ नये.

३) अंगणवाडी सुशोभिकरणाच्या वस्तु, वजनकाटे, पाण्याचे फिल्टर, चटई इ. या निधीमधून खरेदी करु नये.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६३०१०१००२८८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Amol Nilakanth Sakharkar

Digitally signed by Amol Nilakanth Sakharkar
DN: CN = Amol Nilakanth Sakharkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Agriculture Animal Husbandry dairy and Fisheries Department
Date: 2018.06.30 16:23:57 +05'30'

(अ.नि.साखरकर)
अवर सचिव

प्रति,

आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, मुंबई.

प्रत,

१. मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव.
३. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक.

४. प्रधान सचिव (महिला व बाल विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्राम विकास विभाग), मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई
७. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
९. सह संचालक, आरोग्य सेवा (निविमू), मुंबई
१०.सह संचालक (रुग्णालये), मुंबई
११. सह संचालक (तांत्रिक), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
१२. कार्यकारी संचालक, राज्य आरोग्य यंत्रणा संसाधन केंद्र, पुणे
१३. राज्य समन्वय संस्था.
१४. उप सचिव (आरोग्य-७) यांचे स्वीय सहायक
१५.निवडनस्ती (आरोग्य -७) .